**श्री. रविंद्र औताडे, सेवानिवृत्त सहायक दुय्यम निरीक्षक (गट-क), राउशु यांना दुय्यम निरीक्षक (गट-क) या पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन आदेश क्रमांक :- न्यायाप्र-४०१३/प्र.क्र.९४/राउशु-१,**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ०७ ऑगस्ट, २०१८.

**वाचा:-**

१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआव्ही-२००२/प्र.क्र.२/२००२/१२, दि.०६.०६.२००२.

२) मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.६५७५/२०१७ मध्ये मा. न्यायालयाने दि.०४.०४.२०१८ रोजी पारित केलेले आदेश.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/व्हीआयपी २१०/ प्र.क्र.४१२/ का.१२, दि.२१.०८.२०१५.

**शासन आदेश -**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे शासनाने दाखल केलेल्या रिट याचिका क्र.६५७५/२०१७ मध्ये मा. न्यायालयाने दि.०४.०४.२०१८ रोजी पारित केलेल्या आदेशास अनुसरून, श्री. रविंद्र औताडे, सेवानिवृत्त सहाय्यक दुय्यम निरीक्षक, राउशु यांना दुय्यम निरीक्षक (गट-क), राउशु या पदावरील पदोन्नतीचा दि.२१.०६.१९९९ हा दिनांक मानीव दिनांक म्हणून प्रदान करण्यात येत आहे.

२. या प्रकरणी आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांना कळविण्यात येते की, मानीव दिनांकापासून सेवानिवृत्तीच्या तारखेपर्यंत केवळ काल्पनिक वेतननिश्चिती करून, वेतननिश्चितीचा प्रत्यक्ष लाभ सेवानिवृत्तीच्या तारखेपासून अनुज्ञेय करावा. तसेच त्यांना सदर लाभ फक्त निवृत्तीवेतनविषयक लाभ मंजूरीच्या प्रयोजनाकरिता अनुज्ञेय राहील. तथापि, श्री. औताडे यांना वेतन निश्चितीच्या अनुषंगाने थकबाकीची रक्कम अनुज्ञेय ठरणार नाही.

३. सदरहू शासन आदेश विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.L&JD/E R.I.No.५३८-२०१८, दि.०४.०६.२०१८, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७३७/१८, साप्रवि कार्या-१२, दि.२६.०६.२०१८ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९५/१८/सेवा-३, दि.०९.०७.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने आणि सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.२१.०८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०८०७१२५७५९११२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.08.07 13:01:22 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) श्री. रविंद्र औताडे, सेवानिवृत्त सहाय्यक दुय्यम निरीक्षक, राउशु (मार्फत आयुक्त, राउशु)
३) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (सेवा-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८) निवडनस्ती (राउशु-१)